महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (कृषि उपसंचालक) या संवर्गातून महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ (अधिक्षक कृषि अधिकारी) संवर्गात पदोन्नतीबाबत.....

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन आदेश क्रमांक: आकृवि २४२३/प्र.क्र.१०८/१५अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: ०७ मार्च, २०२४.

**संदर्भ**:- १)सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६ब,दि.०७/०५/२०२१,
२) सामान्य प्रशासन विभागाची दि.१४/७/२०२१ रोजीची अधिसूचना

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (कृषि उपसंचालक) संवर्गातून महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (अधिक्षक कृषि अधिकारी) या संवर्गात तात्पुरत्या पदोन्नतीसाठी या विभागामार्फत तयार करण्यात आलेल्या सन २०२२-२३ च्या निवडसूचीस सामान्य प्रशासन विभागाने सहमती दिली आहे. सदर सहमतीस अनुसरुन, खालील नमूद अधिकाऱ्यांना महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (कृषि उपसंचालक) (वेतनश्रेणी एस-२० : रु.५६१०० - १७७५००) संवर्गातून सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (अधिक्षक कृषि अधिकारी) (वेतनश्रेणी एस-२३ : रु.६७७०० - २०८७००) या संवर्गात निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने खालीलप्रमाणे पदस्थापना देण्यास या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | कृषि उप संचालक ज्ये.क्र. | निवड सूचीतील क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला महसूल विभाग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | १४४ | २० | श्री.तसरे ज्ञानेश्वर शेषराव उपविभागीय कृषि अधिकारी, उमरेड, जि.नागपूर. | इ.मा.व. | पुणे | मनुष्यबळ विकास व क्षमता बांधणी तज्ञ, स्मार्ट, पुणे. (रिक्त पदी) |

२. उपरोक्त तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**(अ)** सदर तात्पुरती पदोन्नती ही मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयास अधिन राहुन आणि सा.प्र.वि./१६ब कार्यासनाच्या दि.७/५/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सुचनांनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात रिक्त असलेल्या पदांवर ज्येष्ठतेने देण्यात येत आहेत.

**(ब)** सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्यामुळे पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवाज्येष्ठतेचा हक्क सांगता येणार नाही.

**(क)** संबंधित अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ पदावरील तात्पुरती पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२/९/२०१६, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/का.१२, दि.१/८/२०१९ मधील तरतुदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांचे नाव सन २०२२-२३ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल आणि पुढील दोन वर्षी (सन २०२३-२४ व २०२४-२५) होणाऱ्या निवडसूचीमध्ये त्यांचा नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत (सन २०२५-२६) महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

**(ड)** सदर अधिकाऱ्यांची महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ पदावरील तात्पुरती पदोन्नती ही सदर अधिकाऱ्यांविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

**(इ)** उपरोक्त अधिकाऱ्यांनी त्यांचा सध्याचा पदाचा पदभार विभागातील निकटतम ज्येष्ठ अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रूजू व्हावे. तसेच पुढील बाबही निदर्शनास आणण्यात येते की, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन अधिसूचना दि.२१/६/२०२१ मधील तरतुदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांनी सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात पदोन्नतीच्या पदावर रूजू होणे आवश्यक आहे.

३. वरील अधिकाऱ्यांची परस्पर सेवाज्येष्ठता सामान्य प्रशासन विभागाने सन २०२२-२३ च्या निवडसूचीला दिलेल्या मान्यतेनुसार राहील.

४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०७१८२३०४७७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2024.03.07 18:32:15 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा)१/२ महाराष्ट्र मुंबई /नागपूर.
६) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) सर्व कृषि संचालक, व्दारा आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
८) सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

९) सर्व कृषि सहसंचालक/सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी व्दारा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१०) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (द्वारा-आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे)

११) संबंधित अधिकारी, व्दारा आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१२) निवडनस्ती १५ अे.